**विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना ६०% सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन ज्ञापन क्रमांक :- विजाभज-२०१४/ प्र.क्र १९९/ विजाभज-२,
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरुचौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २६ ऑगस्ट २०१४.

**वाचा** :- १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज २०१४ /प्र.क्र.११०/ अर्थ-३, दि.१ जुलै,२०१४.

२.संचालक, विजाभज इमाव व विमाप्र पुणे, यांचे क्रमांक विजाभजसं/आशा/तरतूदी खर्च/परवानगी/१४-१५/१०२४. दिनांक :- १३/०८/२०१४ चे पत्र.

**ज्ञापन: -** संदर्भाधीन परिपत्रकान्वये वित्त विभागाने सर्व मंत्रालयीन विभागांना महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ च्या अनुषंगाने वित्तीय वर्ष २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीच्या विनियोगाबाबत सूचना दिलेल्या आहेत.

२. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र.एन.३, मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०६ ) विद्यानिकेतन (०६) (०१) विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी सहायक अनुदाने २२२५ २६०२, ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षा खाली एकूण रु.६५,०० हजार (रुपये पासष्ट लक्ष ) इतक्या अर्थसंकल्पीत तरतूदी पैकी ६० % रक्कम रु. ३९,०० हजार (रुपये एकोनचाळीस लक्ष ) इतका निधी वितरीत करण्यास नियोजन विभाग व वित्त विभागाने मंजूरी दिली आहे.

३. वरील मंजूरीनुसार उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या रु.६५,०० हजार इतक्या तरतुदीपैकी ६० % इतका निधी म्हणजेच रु. ३९,०० हजार इतका निधी त्यामध्ये आतापर्यंत झालेल्या खर्चाचा समावेश करण्याच्या अटीवर विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने खालील अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन या ज्ञापनान्वये मंजूरी देत आहे.

१) सदर आश्रमशाळेची निहाय विद्यार्थीसंख्या, उपस्थिती इ. बाबी याविषयीची माहिती उर्वरित ४० टक्के निधी वितरणाच्या वेळी सादर करण्याच्या अटीवर रु.३९,०० हजार इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असून सदर लेखाशीर्षा खाली आतापर्यंत झालेल्या खर्चाचा समावेश वरील वितरीत करण्यात आलेल्या ६० % रकमेमध्ये करण्यात यावा.

२) वरील निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय अधिकार नियम, शासन निर्णय, परिपत्रके, केंद्रीय दक्षता अयोगांची मार्गदर्शक तत्वे व महालेखापाल कार्यालयाने उपस्थित केलेले मुद्दे याबाबतच्या सर्व अटींचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

३) निधी अखर्चीत असल्यास त्याचे ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन सदर निधी जर खर्च करावयाचा नसल्यास शासनाच्या लेख्यामध्ये परत करण्यात यावा.

४) निधी वितरीत करताना मासिक निधी विविरण पत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

४. हे ज्ञापन नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.६६१/व्यय-१४, दि.२३.०८.२०१४ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदरहू ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१४०८२६१७२६०८८९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.08.30 16:33:12 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक,विमुक्त जाती,भटक्या जमाती,इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे

२) आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे

३) सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण विभाग,

४) सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण विभाग,

५) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर

६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

७) नियोजन विभाग (कार्या-१४-१३), मंत्रालय मुंबई

८) वित्त विभाग (कार्या-व्यय -१४) मंत्रालय मुंबई

९) कक्ष अधिकारी, (कार्या. अर्थसंकल्प) सा.न्या. व वि. स.वि., मंत्रालय, मुंबई

१०) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई

११) लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा मुंबई

१२) मा.मंत्री (सा.न्या.)यांचे खाजगी सचिव

१३) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव

१४) सचिव,सामाजिक न्याय यांचे स्वीय सहायक /

१५) निवडनस्ती.